**शासकीय निवासस्थाने मिळण्यास पात्र ठरण्याबाबत.**
**शासकीय कर्मचा-यांच्या मृत्यूमुळे अनुकंपा कारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेले त्यांचे नातेवाईक**

**महाराष्ट्र शासन,**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**परिपत्रक क्रमांक - शानिवा १५९१/प्र.क्र.७५३/२३-अ**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक २२ एप्रिल १९९१.**

**परिपत्रक:-**

सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थान मिळालेला शासकीय कर्मचारी सेवेत असताना निधन पावल्यास अशा निधन पावलेल्या कर्मचा-यास वाटप केलेले शासकीय निवासस्थान. अनुकंपा कारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेल्या त्याच्या नातेवाईकास देण्याबाबत धोरणात्मक निर्णय घेण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत सर्वांगीण विचार करून शासन असे निदेश देत आहे की, सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईतील शासकीय निवासस्थान मिळालेला शासकीय कर्मचारी शासकीय सेवेत असताना निधन पावल्यास अशा निधन पावलेल्या शासकीय कर्मचा-यास मिळालेले शासकीय निवासस्थान किंवा अनुकंपा कारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेल्या त्याच्या नातेवाईकास त्याच्या सेवाश्रेणीनुसार अनुज्ञेय असलेले शासकीय निवासस्थान मिळण्यास शासकीय सेवेत असताना निधन पावलेल्या शासकीय कर्मचा-याचा नातेवाईक पात्र समजला जावा.

२. वर नमूद केल्याप्रमाणे शासकीय सेवेत असताना निधन पावलेल्या शासकीय कर्मचा-याचा अनुकंपाकारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेला नातेवाईक शासकीय निवासस्थान मिळण्यास पात्र ठरण्यासाठी त्याने पुढील अटींची पुर्तता करणे आवश्यक राहिल:-

१) शासकीय सेवेत असताना निधन पावलेल्या शासकीय कर्मचा-याच्या नातेवाईकाची अनुकंपाकारणास्तव शासकीय सेवेतील नेमणूक शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक -अकंपा १०८४/१८९/सीआर-१५५/तेरा-अ. दिनांक ८.३.८५ अन्वये आणि त्यात वेळोवेळी करण्यात येणा-या बदलान्वये विहित करण्यात आलेल्या नियमावलीतील तरतुदीनुसार झालेली असणे आवश्यक आहे. तथा आशयाचे विभाग/कार्यालय प्रमुख यांचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

२) शासकीय कर्मचा-याच्या मृत्यूमुळे अनुकंपाकारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झाल्यामुळे शासकीय निवासस्थान मिळण्यास पात्र ठरलेल्या शासकीय कर्मचा-याने असे हमीपत्र देणे आवश्यक आहे की. त्याला मिळालेल्या शासकीय निवासस्थानात तो. शासकीय सेवेत असताना निधन पावलेल्या शासकीय कर्मचा-याच्या कुटुंबातील इतर सदस्यांसह राहिल व त्यांची काळजी घेईल.

..२/-

३) शासकीय कर्मचा–याच्या मृत्यूमुळे अनुकंपाकारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेल्या कर्मचा–याने, शासकीय सेवेत असतांना निधन पावलेल्या शासकीय कर्मचा–याने किंवा त्यांचे कुटुंबिय यांनी शासकीय निवासस्थानाचा गैरवापर केलेला नाही अशा आशयाचे संबंधित कार्यकारी अभियंत्याचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक आहे.

४) शासकीय कर्मचा–याच्या मृत्यूमुळे अनुकंपाकारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेल्या कर्मचा–याने त्याचे स्वतःचे, शासकीय सेवेत असताना निधन पावलेला कर्मचारी किंवा यांच्या कुटुंबातील कोणाही सदस्याचे बृहन्मुंबई,ठाणे किंवा नवी मुंबई येथे भाडयाचे किंवा मालकीचे घर/सदनिका नाही असे शपथपत्र देणे आवश्यक आहे.

३. शासकीय कर्मचा–याबाबत शासकीय सेवेत असताना मृत्यू ही घटना घडण्यापूर्वीपासून शासकीय सेवेत असलेला व त्याच्यासोबत राहाणारा त्याच्या कुटुंबातील सदस्यही शासकीय निवासस्थान मिळण्यास पात्र समजला जाईल. त्याची सेवा बदलीपात्र असण्याची आवश्यकता नाही.

४. शासकीय कर्मचा–याच्या मृत्यूमुळे अनुकंपाकारणास्तव शासकीय सेवेत नेमणूक झालेल्या कर्मचा–याची सेवा अबदलीपात्र असली तरी तो शासकीय निवासस्थान मिळण्यास पात्र समजला जाईल.

५. सर्व मंत्रालयीन विभाग व बृहन्मुंबईतील विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख यांनी कृपया हे परिपत्रक सर्व अधिकारी/कर्मचारी यांच्या निदर्शनास आणून द्यावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-
( अ.व.आम्बेरकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

मा.राज्यपालांचे सचिव
मा.मुख्यमंत्र्याचे सचिव
मा.राज्यमंत्री (सामान्य प्रशासन) यांचे स्वीय सहायक,
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
◆प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
◆प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
◆प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, पहिला मजला, मुंबई –३२
◆सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई
◆सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
इतर सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांच्या अधिपत्याखालील बृहन्मुंबईतील सर्व विभाग प्रमुख/कार्यालय प्रमुख
निवड नस्ती.
◆पत्राने